**राज्याचे नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोत (अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत) यापासून वीज निर्मितीच्या पारेषण संलग्न प्रकल्पांसाठी एकत्रित धोरण-२०१५.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-अपाऊ-२०१५/प्र.क्र.४९ /ऊर्जा-७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: - २० जुलै, २०१५.

वाचा :-

१) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग:-क्रमांक-अपाऊ- २००७/प्र.क्र.६९३/ऊर्जा-७, दि.१४ ऑक्टोबर, २००८.
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्रमांक-पवन-२०१०/प्र.क्र.१३४/ऊर्जा-७, दि.१४ जुलै, २०१०.
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्रमांक: अपाऊ-२०१४/प्र.क्र. १४४/२०१४/ ऊर्जा-७, दि. ३० ऑगस्ट, २०१४.

**प्रस्तावना :-**

नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मितीचे अनन्यसाधारण महत्त्व लक्षात घेऊन केंद्र शासनाने अशा ऊर्जा स्त्रोतांद्वारे देशात सन २०२२ पर्यंत १७५ गिगावॅट एवढा वीजनिर्मितीचा विस्तार करण्याचे उद्दिष्ट जाहीर केले आहे. यामध्ये १०० गिगावॅट सौर ऊर्जा निर्मितीचा समावेश आहे. त्या दृष्टीने देशभरात व राज्यांमध्ये नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांपासून वीजनिर्मितीचे कार्यक्रम हाती घ्यावयाचे आहेत.

राज्यात नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोत मुबलक प्रमाणात आहेत. त्यातील पवन व सौर यासारख्या स्त्रोतांबरोबरच ऊसाची चिपाडे, कृषिजन्य टाकाऊ पदार्थ, सेंद्रीय टाकाऊ पदार्थ, वैद्यकीय टाकाऊ पदार्थ, खनिजजन्य व इतर टाकाऊ पदार्थांसह औद्योगिक टाकाऊ पदार्थांसारख्या स्त्रोतांपासून वीज निर्मिती करता येणे शक्य आहे. या सर्व स्त्रोतांचे महत्व व वाव लक्षात घेऊन पवन ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प; ऊसाची चिपाडे / कृषि अवशेषांवर आधारित सहवीज निर्मिती प्रकल्प; लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्प; कृषिजन्य टाकाऊ पदार्थ, सेंद्रीय टाकाऊ पदार्थ, वैद्यकीय टाकाऊ पदार्थ, खनिजजन्य व इतर टाकाऊ पदार्थांसह औद्योगिक टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मिती प्रकल्प व सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प अशा पारेषण संलग्न प्रकल्पांना चालना देण्यासाठी एकत्रित धोरण जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर योजना राबविण्यास मंत्रिमंडळाने दिनांक २.६.२०१५ रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यानुसार आता खालीलप्रमाणे धोरणास मान्यता देण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१. उद्दिष्ट:-सदर धोरणांतर्गत राज्यात पारेषण संलग्न असे खालील क्षमतेचे प्रकल्प स्थापन करण्याचे निश्चित करण्यात येत आहे.

.१.१ ५००० मे.वॅ. क्षमतेचे पवन ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प,

१००० मे.वॅ. क्षमतेचे ऊसाच्या चिपाडावर/कृषि अवशेषांवर आधारित सह-वीज निर्मिती प्रकल्प,

४०० मे.वॅ. क्षमतेचे लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्प,

३०० मे.वॅ. क्षमतेचे कृषिजन्य अवशेषांवर आधारित वीज निर्मिती प्रकल्प,

२०० मे.वॅ. क्षमतेचे औद्योगिक टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मिती प्रकल्प आणि

७५०० मे.वॅ. क्षमतेचे सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प

असे एकूण १४,४०० मे.वॅ. क्षमतेचे नवीन व नवीकरणीय ऊर्जेपासून वीज निर्मितीचे पारेषण संलग्न प्रकल्प पुढील पाच वर्षांमध्ये आस्थापित करण्याचे उद्दिष्ट निश्चित करण्यात येत आहे.

१.२ या धोरणांतर्गत प्रकल्प आस्थापित व कार्यान्वित करणे, प्रोत्साहनात्मक बाबी लागू करणे व धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करणे या दृष्टीने वस्तुनिष्ठ व सुटसुटीत अशी कार्यपध्दती वेगळ्याने निर्गमित करण्यात येईल.

१.३ या धोरणा अंतर्गत समाविष्ठ प्रकल्प जलदगतीने विकसीत होण्यासाठी केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय मंत्रालयाकडे प्रकल्पांतर्गत आवश्यक बाबींच्या पूर्ततेसाठी महाऊर्जा कार्यालयाकडून सहाय्य करण्यात येईल.

१.४ सदर धोरणांतर्गत विविध नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मितीचे प्रकल्प आस्थापित करताना सौर ऊर्जेची जोड देऊन संकरित (hybrid) पद्धतीने प्रकल्प विकसित करण्याची मुभा राहील. केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालयाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार असे प्रकल्प उभारण्यात येतील. अशा प्रकल्पांना वीज नियामक आयोगाने वेगळ्याने निश्चित केलेले वीज खरेदी दर लागू राहतील.

१.५ नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांपासून निर्माण होणारी वीज स्वच्छ व पर्यावरण पोषक असल्याने त्यास चालना देण्यासाठी व अधिकाधिक प्रकल्प राज्यात आस्थापित होण्याच्या दृष्टीने राज्य विद्युत नियामक आयोगाकडून नवीन व नवीकरणीय ऊर्जा निर्मिती प्रकल्पांकरिता त्यांची वैशिष्ट्ये विचारात घेऊन स्वतंत्ररित्या खुला प्रवेश नियमावली (open access regulation) तसेच प्रोत्साहनात्मक खुला प्रवेश शुल्क (open access charges) जाहीर करण्यात येईल.

१.६ या धोरणात ठरविलेल्या उद्दीष्टात फेरबदल तसेच मध्यवर्ती आढावा व येणाऱ्या अडचणी दूर करण्याकरिता मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली आंतर विभागीय समिती गठित करण्यात येईल. याकरिता ऊर्जा विभागाकडून स्वतंत्रपणे आदेश काढण्यात येतील.

१.६.१. सदर धोरणाचे मध्यावधी पुनर्विलोकन करण्यात येईल. मात्र या वेळी धोरणा अंतर्गत सुधारणा करण्यात आल्यास त्याची अंमलबजावणी त्या दिनांकापासून लागू राहिल. सदर सुधारणा आधीचे मंजूर प्रकल्पांसाठी लागू होणार नाही.

नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतनिहाय सदरचे धोरण पुढीलप्रमाणे असेल:-

२. पवन ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प :-

२.१ महाराष्ट्र राज्यात पवनऊर्जेचा वापर, प्रकल्प उभारणीचा वाव तसेच करण्यात येत असलेले वारा परिमापन लक्षात घेता या धोरणांतर्गत एकूण ५००० मे.वॅ. क्षमतेचे पवनऊर्जा प्रकल्प कार्यान्वित करण्याचे उद्दिष्ट ठेवण्यात येत आहे. यात १५०० मे.वॅ.RPO पूर्ण करण्याकरिता राहणार आहे.

२.२ या धोरणांतर्गत पवनऊर्जा प्रकल्प स्थळी असलेला अनुकूल वाव विचारात घेता योग्य मायक्रोसाइटिंग करून उच्चतम सुधारित तंत्रज्ञानावर आधारित व अधिक क्षमतेची पवनऊर्जा जनित्रे आस्थापित (re-powering) करण्याची मुभा प्रकल्प विकासकांना / प्रकल्पधारकांना देण्यात येईल.

२.२.१ केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालयाच्या याविषयीच्या मार्गदर्शक तत्वांनुसार अशा प्रकल्पांची उभारणी करता येईल. या धोरणांतर्गत अशा प्रकल्पांचा नोंदणीसाठी विचार करण्यात येईल.

२.३ या धोरणांतर्गत पवन ऊर्जा प्रकल्पांसाठी घेण्यात येणाऱ्या जमिनींच्या बाबतीत बिगर शेती जमिनीचा (non-agricultural land) मानीव दर्जा (deemed status) लागू राहील.

२.४ या धोरणांतर्गत पवन ऊर्जा प्रकल्पांना प्रदूषण नियंत्रण मंडळाच्या संमती / ना-हरकत प्रमाणपत्र घेण्यापासून सूट देण्यात येत आहे.

२.५ सदर धोरण सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात तात्काळ प्रभावाने लागू राहील. मात्र राज्यातील वीज वितरण परवानाधारक कंपन्यांना त्यांचे नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधन (R.P.O.) पूर्ण करण्यासाठी प्रस्तावित १५०० मे.वॅ. पवन ऊर्जा प्रकल्पांतर्गत अद्याप पर्यन्त कार्यान्वित झालेले सुमारे १३५० मे.वॅ. क्षमतेचे पवन ऊर्जा प्रकल्प सध्याच्या MERC यांनी अधिसूचित खरेदी नियमावली प्रमाणे अंतर्भूत राहतील. मात्र त्यांना महाऊर्जाकडे नोंदणी करणे बंधनकारक राहिल.

२.६. या धोरणांतर्गत ३५०० मे.वॅ.क्षमतेचे पवन ऊर्जेपासून वीजनिर्मितीचे प्रकल्प विकासकाकडून राज्याबाहेर स्वयंवापर/ समूह स्वयंवापर ( captive use) यासाठी किंवा राज्याबाहेर तिस-या घटकास वीज विक्री करण्यासाठी किंवा नूतनशील ऊर्जा प्रमाणपत्र ( Renewable Energy Certificate) च्या मार्गाने विकसित करता येईल. त्यासाठी त्यांना संबंधित वीज नियामक आयोगाच्या नियमावलीनुसार राज्याबाहेरील खुला प्रवेश देण्यात येईल.

२.७ या धोरणांतर्गत पवन ऊर्जा प्रकल्पांसाठी निष्कासन व्यवस्थेची उभारणी व खर्च याबाबत महाराष्ट्र वीज नियामक आयोगाची नियमावली व आदेश लागू राहतील. सदर निष्कासन व्यवस्था उभारणीसाठी घेण्यात येणारे पर्यवेक्षण शुल्क (supervision charges) लागू राहणार नाही.

२.८ या धोरणांतर्गत आस्थापित होणाऱ्या पवन ऊर्जा प्रकल्पांना त्यांची इच्छा असल्यास उद्योग विभागाकडे अर्ज करुन उद्योग घटक म्हणून नोंदणी करून घेण्याची मुभा राहील.

२.९ या धोरणांतर्गत आस्थापित करावयाच्या पवन ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्पांची महाऊर्जाकडे नोंदणी करावी लागेल.

२.१० सदर धोरणांतर्गत आस्थापित केलेल्या पवनऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्पांना शासन निर्णय क्र. अपाऊ-२०१३/प्र.क्र.१२१/ऊर्जा-७ दिनांक २१.०८.२०१३ या मधील रस्तेदुरूस्ती विषयक तरतुदी लागू राहतील.

३. ऊसाच्या चिपाडांवर / कृषि अवशेषांवर आधारित सह-वीज निर्मिती प्रकल्प :-

३.१ साखर कारखाने व कृषि उद्योगांमधून उपलब्ध होणाऱ्या उप-पदार्थांपासून (ऊसाचे चिपाड/भात कोंडा इ.) राज्यास अतिरिक्त वीज उपलब्ध होऊ शकते. शिवाय शेतकऱ्यांना त्यांच्या शेतमालावर अधिक लाभ मिळू शकतो. अशा प्रकल्पांना चालना देणे आवश्यक आहे. या धोरणांतर्गत १००० मे.वॅ. क्षमतेच्या ऊसाच्या चिपाडावर / कृषि अवशेषांवर आधारित सह-वीज निर्मिती प्रकल्पांना आस्थापीत करण्याचे उद्दीष्ट ठरविण्यात येत आहे.

३.२ या धोरणांतर्गत ऊसाच्या चिपाडावर / कृषि अवशेषांवर आधारित सह-वीज निर्मितीच्या प्रकल्प विकासक / प्रकल्पधारकाने सर्वप्रथम राज्यातील कोणत्याही वीज वितरण परवानाधारक कंपन्यांना त्यांचे नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधन (Renewable Purchase Obligation) पूर्ण करण्यासाठी MERC यांनी ठरविलेल्या Fixe दरा प्रमाणे वीज विक्री करणे आवश्यक राहील. वीज वितरण परवानाधारक कंपन्यांचे नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधन पूर्ण झाल्यानंतर प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक विजेचा स्वयंवापर करु शकतील किंवा राज्यातील / राज्याबाहेरील इतर ग्राहकास वीज विक्री करू शकतील. तसेच नित्यनूतनशील ऊर्जा प्रमाणपत्राच्या (Renewable Energy Certificate) मार्गाने वीज विक्री करता येईल.

३.३ या धोरणांतर्गत उसाच्या चिपाडावर/कृषी अवशेषांवर आधारित सहवीज निर्मिती प्रकल्पांसाठी निष्कासन व्यवस्थेची उभारणी व खर्च याबाबत महाराष्ट्र वीज नियामक आयोगाची नियमावली व आदेश लागू राहतील. सदर निष्कासन व्यवस्था उभारणीसाठी घेण्यात येणारे पर्यवेक्षण शुल्क (supervision charges) लागू राहणार नाही.

३.४ विद्युत शुल्क :- या धोरणांतर्गत आस्थापित होणाऱ्या ऊसाच्या चिपाडावर/कृषि अवशेषांवर आधारित सह-वीज निर्मिती प्रकल्पातून निर्माण होणाऱ्या विजेचा वापर स्वतःच्या वापरासाठी केल्यास प्रकल्प कार्यान्वित झाल्याच्या दिनांकापासून पहिल्या १० वर्षाकरिता विद्युत शुल्क आकारले जाणार नाही.

३.५ ऊस खरेदी करातील सूट मिळण्यासाठी प्रकल्पातून निर्माण होणा-या अतिरिक्त पारेषित विजेची किमान मर्यादा ३ मे.वॅ. (३५ लाख युनिट) वा त्यापेक्षा अधिक अशी राहील. शिवाय याविषयी शासन निर्णय क्र.बगास-२०१३/प्र.क्र.१६५/ऊर्जा-७ दि.३१-०१-२०१४ मधील इतर सर्व तरतुदी लागू राहतील.

३.६ सदर धोरण जाहीर झाल्यापासून मूलभूत सुविधा संमती प्राप्त करणा-या ऊसाच्या चिपाडावर / कृषि अवशेषांवर आधारित सह-वीज निर्मिती प्रकल्पांना या धोरणांतर्गत असणा-या तरतुदी व प्रोत्साहनात्मक बाबी लागू राहतील. यापूर्वीच्या सहवीज निर्मिती संबंधी धोरणांच्या अंतर्गत ज्या प्रकल्पांना मूलभूत सुविधा संमती देण्यात आली आहे, त्या सर्व प्रकल्पांना,इतरत्र काहीही अंतर्भूत असले तरी, तत्कालिन धोरणा प्रमाणे प्रोत्साहनात्मक बाबी लागू राहतील.

३.७ या धोरणांतर्गत सह-वीज निर्मिती प्रकल्पापासून वीज निर्मिती करणा-या प्रकल्प विकासक/प्रकल्प धारकांनी त्यांच्या प्रकल्पाकरिता थेट नेमणूक केलेल्या मनुष्यबळापैकी ८० टक्के अकुशल व ५० टक्के अर्धकुशल/कुशल कामगार स्थानिक ग्रामपंचायत हद्दी मधून निवडणे अपेक्षित

राहील. यासाठी प्रकल्पांतर्गत घेतलेल्या अकुशल कामगारांना योग्य तांत्रिक प्रशिक्षणाद्वारे कुशल बनविण्याची सोय प्रकल्पधारकाने करावी. अशा प्रकल्पांसाठी जमीन उपलब्ध करून देणा-या कुटुंबातील किमान एका सदस्याला प्राधान्याने रोजगार द्यावा.

३.८ या धोरणांतर्गत सह-वीज निर्मिती प्रकल्पापासून वीज निर्मिती करणा-या प्रकल्प विकासक/ प्रकल्पधारकांनी त्यांच्या प्रकल्पांतर्गत प्राप्त होणा-या एकूण नफ्याच्या २ % रक्कम कंपनी कडील सामाजिक जबाबदारी (Social Responsibility) अंतर्गत प्रथम स्थानिक ग्रामपंचायतीमधील सुधारणांसाठी उदा. पाणीपुरवठा योजना, आरोग्य सेवा, शाळा व अपारंपरिक ऊर्जा साधनांची आस्थापना करणे यासाठी खर्च करणे अपेक्षित राहील. सदर स्थानिक ग्रामपंचायत हद्दीमध्ये आवश्यक सोयी उपलब्ध करून दिल्यानंतर नजीकच्या ग्रामपंचायत हद्दीमध्ये याअंतर्गत सुधारणा करावी.

३.९ या धोरणांतर्गत आस्थापित करावयाच्या ऊसाच्या चिपाडावर / कृषि अवशेषांवर आधारित सहवीज निर्मिती प्रकल्पांना महाऊर्जाकडून मूलभूत सुविधा संमती देण्यात येईल.

३.१० ऊसाच्या चिपाडावर / कृषि अवशेषांवर आधारित सहवीज निर्मिती संदर्भात शासन निर्णय क्र. अपाऊ-२०१४/प्र.क्र.१४४/ऊर्जा-७, दिनांक ३०-०८-२०१४ अन्वये जाहीर केलेले धोरण याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

४. लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्प :- राज्यात लघुजल विद्युत निर्मिती प्रकल्पांद्वारे अतिरिक्त वीज निर्मिती करण्यास चांगला वाव आहे. त्यामध्ये २५ मे.वॅ. क्षमतेपर्यंत जलसंपदा विभागाकडून खाजगी विकासकांमार्फत विकसित करण्यात येणारे सर्व प्रकारचे लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्प समाविष्ट असून त्यांच्या उभारणीस चालना देणे आवश्यक आहे. याकरीता सदर धोरणांतर्गत २५ मे.वॅ. क्षमतेपर्यंतच्या सर्व प्रकारच्या लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पांचा समावेश करण्यात येत आहे.

४.१ राज्यात लघुजल विद्युत निर्मिती प्रकल्पांद्वारे वीज निर्मिती करण्यास चांगला वाव आहे. २५ मे.वॅ.क्षमतेपर्यंतचे एकूण ४०० मे.वॅ.क्षमतेचे लघुजल प्रकल्प आस्थापित करण्याचे उद्दिष्ट या धोरणात पूर्ण करण्याचे योजिले आहे.

४.२ या धोरणांतर्गत लघु जल विद्युत निर्मितीच्या प्रकल्प विकासक / प्रकल्पधारकाने सर्वप्रथम राज्यातील कोणत्याही वीज वितरण परवानाधारक कंपन्यांना त्यांचे नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधन (Renewable Purchase Obligation) पूर्ण करण्यासाठी MERC यांनी ठरविलेल्या दरा प्रमाणे वीज विक्री करणे आवश्यक राहील. वीज वितरण परवानाधारक कंपन्यांचे नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधन पूर्ण झाल्यानंतर प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक विजेचा स्वयंवापर करू शकतील किंवा राज्यातील / राज्याबाहेरील इतर ग्राहकास वीज विक्री करू शकतील. तसेच नित्यनूतनशील ऊर्जा प्रमाणपत्राच्या (Renewable Energy Certificate) मार्गाने वीज विक्री करता येईल.

४.३ निष्कासन व्यवस्था :-

४.३.१ प्रकल्पासाठी लागणा-या लघु दाब, उच्च दाब आणि अति उच्च दाब उपकेंद्राचे व त्यांना लागणा-या पारेषण व वितरण वाहिन्यांचे सर्वेक्षण महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी व प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक संयुक्तपणे करतील.

४.३.२ सर्वेक्षणाप्रमाणे उभारण्यात येणारी लघुदाब, उच्च दाब व अति उच्च दाब उपकेंद्रे व त्यांना लागणा-या लघु दाब, उच्च दाब व अति उच्च दाबाच्या पारेषण व वितरण वाहिन्यांची कामे प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीच्या तांत्रिक परिमाणानुसार (Technical Specifications) व त्यांनी मान्य केलेल्या अंदाजपत्रकानुसार तसेच महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीच्या देखरेखीखाली स्वखर्चाने करून घेईल.

४.३.३ या निष्कासन व्यवस्थेमध्ये अस्तित्वात असलेली उपकेंद्रे आणि पारेषण व वितरण वाहिन्यांमध्ये जे काही सुदृढीकरण अथवा बदल करावे लागतील त्यांचा समावेश असेल.

४.३.४ अशा प्रकल्पांच्या ठिकाणापासून ते लघु दाब, उच्च दाब व अति-उच्च दाब उपकेंद्रापर्यंत जोडल्या जाणाऱ्या ११ केव्ही व त्यापेक्षा अधिक दाबाच्या वाहिन्यांचा समावेश या निष्कासन व्यवस्थेमध्ये असेल.

४.३.५ निष्कासन व्यवस्थेचा खर्च :- हरित ऊर्जा निधीतून निष्कासन व्यवस्थेच्या खर्चापोटी देय असलेल्या अर्थसहाय्यासाठी महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी/महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीने मंजूर केलेले अंदाजपत्रक आणि त्यांनी प्रमाणित केलेल्या प्रत्यक्ष खर्चाची रक्कम यापैकी जी कमी असेल ती रक्कम निष्कासन व्यवस्थेचा खर्च म्हणून गृहित धरण्यात येईल.

४.३.६ लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पांसाठी प्रकल्प विकासकाने / प्रकल्पधारकाने स्वखर्चाने उभारलेल्या निष्कासन व्यवस्थेसाठी प्रति प्रकल्प कमाल रु.१ कोटी एवढी रक्कम अर्थसहाय्य म्हणून महाऊर्जाकडून प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक यांना हरित ऊर्जा निधीमधून निधीच्या उपलब्धतेनुसार परतावा स्वरूपात देण्यात येईल.

४.३.७ लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पांसाठी तयार केलेली निष्कासन व्यवस्था महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांच्याकडे हस्तांतरित झाल्यानंतर, त्याचप्रमाणे महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांनी त्याबाबत व निष्कासन व्यवस्थेच्या खर्चाबाबत प्रमाणित केल्यानंतरच निष्कासन व्यवस्थेसाठी हरित ऊर्जा निधीच्या उपलब्धतेनुसार महाऊर्जाकडून अर्थसहाय्य देण्यात येईल.

४.४ भांडवली अनुदान :-

४.४.१ सदर नवीन धोरणांतर्गत मंजूर केलेल्या लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पांना हरित ऊर्जा निधी मधून भांडवली अनुदान देय राहील. सदर भांडवली अनुदान रु.५०,०००/- प्रति कि.वॅ. प्रमाणे परंतु कमाल रु.१ कोटी प्रति प्रकल्प एवढे देण्यात येईल.

४.४.२ सदर भांडवली अनुदान प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर तसेच प्रकल्प कार्यान्वित झाल्याचे व वीज पारेषित होत असल्याचे संबंधित महापारेषण/महावितरण कंपनीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर प्रकल्प विकासकास महाऊर्जाकडून हरित ऊर्जा निधीमधून निधीच्या उपलब्धतेनुसार वितरित करण्यात येईल.

४.५ विद्युत शुल्क :- या धोरणांतर्गत आस्थापित होणा-या लघु जल विद्युत निर्मिती प्रकल्पातून निर्माण होणा-या विजेचा वापर स्वत:च्या वापरासाठी केल्यास प्रकल्प कार्यान्वित झाल्याच्या दिनांकापासून पहिल्या १० वर्षाकरिता विद्युत शुल्क आकारले जाणार नाही.

४.६ लघुजल वीज निर्मिती प्रकल्पासाठी वीज खरेदी दर ठरविताना या धोरणांतर्गत देण्यात येणा-या प्रोत्साहनात्मक बाबी राज्य वीज नियामक आयोगाकडून विचारात घेण्यात येतील.

४.७ या धोरणांतर्गत देय असणाऱ्या प्रोत्साहनात्मक बाबींकरिता प्रकल्प विकासक / प्रकल्पधारकास महाऊर्जाकडून मूलभूत सुविधा संमती देण्यात येईल.

४.८ या धोरणांतर्गत लघुजल विद्युत निर्मिती करणा-या (सूक्ष्म जल विद्युत निर्मिती वगळून) प्रकल्प विकासक / प्रकल्प धारकांनी त्यांच्या प्रकल्पाकरिता थेट नेमणूक केलेल्या मनुष्यबळापैकी ८० टक्के अकुशल व ५० टक्के अर्धकुशल / कुशल कामगार स्थानिक ग्रामपंचायत हद्दी मधून निवडणे अपेक्षित राहील. यासाठी प्रकल्पांतर्गत घेतलेल्या अकुशल कामगारांना योग्य तांत्रिक प्रशिक्षणाद्वारे कुशल बनविण्याची सोय प्रकल्पधारकाने करावी. अशा प्रकल्पांसाठी जमीन उपलब्ध करून देणा-या कुटुंबातील किमान एका सदस्याला प्राधान्याने रोजगार द्यावा.

४.९ या धोरणांतर्गत लघुजल विद्युत निर्मिती करणा-या (सूक्ष्म जल विद्युत निर्मिती वगळून) प्रकल्प विकासक/ प्रकल्पधारकांनी त्यांच्या प्रकल्पांतर्गत प्राप्त होणा-या एकूण नफ्याच्या २ टक्के रक्कम कंपनी कडील सामाजिक जबाबदारी (Social Responsibility) अंतर्गत प्रथम स्थानिक ग्रामपंचायतीमधील सुधारणांसाठी उदा. पाणीपुरवठा योजना, आरोग्य सेवा, शाळा व अपारंपरिक ऊर्जा साधनांची आस्थापना करणे यासाठी खर्च करणे अपेक्षित राहील. सदर स्थानिक ग्रामपंचायत हद्दीमध्ये आवश्यक सोयी उपलब्ध करून दिल्यानंतर नजीकच्या ग्रामपंचायत हद्दीमध्ये याअंतर्गत सुधारणा करावी.

४.१० लघु जल विद्युत निर्मिती संदर्भात शासन निर्णय क्र. अपाऊ-२०१४/प्र.क्र.१४४/ऊर्जा-७, दिनांक ३०-०८-२०१४ अन्वये जाहीर केलेले धोरण याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

५. कृषिजन्य अवशेषांवर आधारित वीज निर्मिती प्रकल्प :-

५.१ शेतीतील टाकाऊ कृषिजन्य अवशेषांपासून अतिरिक्त वीजनिर्मिती होऊ शकते. अशा प्रकल्पांमुळे शेतकऱ्यांना टाकाऊ कृषि अवशेषांपासून अधिक लाभ मिळविता येऊ शकतो. शिवाय ग्रामीण भागात रोजगार निर्मिती होऊ शकते. या धोरणांतर्गत कृषिजन्य अवशेषांवर आधारित वीज निर्मिती करिता ३०० मे.वॅ. एवढे उद्दिष्ट ठेवण्यात येत आहे. अशा प्रकल्पांना कायमस्वरूपी टाकाऊ कृषिजन्य अवशेष मिळत राहणे महत्वाचे आहे.

५.२ या प्रकल्पांकरिता कृषिजन्य अवशेष संकलन क्षेत्र निर्धारित करणे गरजेचे असते. त्यामुळे विकसित होणा-या अशा प्रकल्पांना त्यांच्या क्षमतेनुसार योग्य प्रमाणात टाकाऊ कृषि अवशेषांचा पुरवठा होण्यासाठी योग्य संकलन क्षेत्र देणे गरजेचे आहे. या धोरणान्वये कम्बशन व गॅसिफिकेशन तंत्रज्ञानाद्वारे वीज निर्मिती प्रकल्प विकसित करण्यात येतील.

५.३ या धोरणांतर्गत कृषिजन्य अवशेषांवर आधारित वीज निर्मितीच्या प्रकल्प विकासक /प्रकल्पधारकाने सर्वप्रथम राज्यातील कोणत्याही वीज वितरण परवानाधारक कंपन्यांना त्यांचे

नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधन (Renewable Purchase Obligation) पूर्ण करण्यासाठी MERC द्वारे ठरविलेले दरानुसार वीज विक्री करणे आवश्यक राहील. वीज वितरण परवानाधारक कंपन्यांचे नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधन पूर्ण झाल्यानंतर प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक विजेचा स्वयंवापर करू शकतील किंवा राज्यातील / राज्याबाहेरील इतर ग्राहकास वीज विक्री करू शकतील. तसेच नित्यनूतनशील ऊर्जा प्रमाणपत्राच्या (Renewable Energy Certificate) मार्गाने वीज विक्री करता येईल.

५.४ निष्कासन व्यवस्था :-

५.४.१ प्रकल्पासाठी लागणा-या लघु दाब, उच्च दाब आणि अति उच्च दाब उपकेंद्राचे व त्यांना लागणा-या पारेषण व वितरण वाहिन्यांचे सर्वेक्षण महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी व प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक संयुक्तपणे करतील.

५.४.२ सर्वेक्षणाप्रमाणे उभारण्यात येणारी लघुदाब, उच्च दाब व अति उच्च दाब उपकेंद्रे व त्यांना लागणा-या लघु दाब, उच्च दाब व अति उच्च दाबाच्या पारेषण व वितरण वाहिन्यांची कामे प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीच्या तांत्रिक परिमाणानुसार (Technical Specifications) व त्यांनी मान्य केलेल्या अंदाजपत्रकानुसार तसेच महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीच्या देखरेखीखाली स्वखर्चाने करून घेईल.

५.४.३ या निष्कासन व्यवस्थेमध्ये अस्तित्वात असलेली उपकेंद्रे आणि पारेषण व वितरण वाहिन्यांमध्ये जे काही सुदृढीकरण अथवा बदल करावे लागतील त्यांचा समावेश असेल.

५.४.४ प्रकल्पांच्या ठिकाणापासून ते उच्च दाब व अति उच्च दाब उपकेंद्रापर्यंत जोडल्या जाणा-या ३३ के.व्ही. व त्यापेक्षा अधिक दाबाच्या वाहिन्यांचाही समावेश या निष्कासन व्यवस्थेमध्ये असेल.

५.४.५ निष्कासन व्यवस्थेचा खर्च :- हरित ऊर्जा निधीतून निष्कासन व्यवस्थेच्या खर्चापोटी देय असलेल्या अर्थसहाय्यासाठी महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीने मंजूर केलेले अंदाजपत्रक आणि त्यांनी प्रमाणित केलेल्या प्रत्यक्ष खर्चाची रक्कम यापैकी जी कमी असेल ती रक्कम निष्कासन व्यवस्थेचा खर्च म्हणून गृहित धरण्यात येईल.

५.४.६ निष्कासन व्यवस्थेच्या खर्चाचा हरित ऊर्जा निधीमधून परतावा :- कृषिजन्य अवशेषांवर आधारित वीज निर्मिती प्रकल्पांसाठी प्रकल्प विकासकाने / प्रकल्पधारकाने स्वखर्चाने उभारलेल्या निष्कासन व्यवस्थेसाठी प्रति प्रकल्प कमाल रु.१ कोटी एवढी रक्कम अर्थसहाय्य म्हणून महाऊर्जाकडून प्रकल्प विकासक/प्रकल्पधारक यांना हरित ऊर्जा निधीमधून निधीच्या उपलब्धतेनुसार परतावा स्वरूपात देण्यात येईल.

५.४.७ कृषि अवशेषांवर आधारित वीज निर्मिती प्रकल्पांसाठी तयार केलेली निष्कासन व्यवस्था महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी/महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांच्याकडे हस्तांतरित झाल्यानंतर, त्याचप्रमाणे महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी/महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांनी त्याबाबत व निष्कासन व्यवस्थेच्या खर्चाबाबत प्रमाणित केल्यानंतरच निष्कासन व्यवस्थेसाठी हरित ऊर्जा निधीच्या उपलब्धतेनुसार महाऊर्जाकडून अर्थसहाय्य देण्यात येईल.

५.५ भांडवली अनुदान :-

५.५.१. कृषिजन्य अवशेषांवर आधारित वीज निर्मिती प्रकल्प उभारण्यासाठी प्रति प्रकल्प रु.१ कोटी भांडवली अनुदान देण्यात येईल.

५.५.२. सदर भांडवली अनुदान प्रकल्प वीज कार्यान्वित झाल्यानंतर तसेच प्रकल्प कार्यान्वित झाल्याचे व वीज पारेषित होत असल्याचे संबंधित महापारेषण/ महावितरण कंपनीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर प्रकल्प विकासकास महाऊर्जाकडून हरित ऊर्जा निधीमधून निधीच्या उपलब्धतेनुसार वितरित करण्यात येईल.

५.६ विद्युत शुल्क :- या धोरणांतर्गत आस्थापित होणाऱ्या कृषिजन्य अवशेषांवर आधारित वीज निर्मिती प्रकल्पातून निर्माण होणाऱ्या विजेचा वापर स्वत:च्या वापरासाठी केल्यास प्रकल्प कार्यान्वित झाल्याच्या दिनांकापासून पहिल्या १० वर्षांकरिता विद्युत शुल्क आकारले जाणार नाही.

५.७ कृषी अवशेषांवर आधारित वीज निर्मिती प्रकल्पासाठी वीज खरेदी दर ठरविताना या धोरणांतर्गत देण्यात येणा-या प्रोत्साहनात्मक बाबी राज्य वीज नियामक आयोगाकडून विचारात घेण्यात येतील.

५.८ या धोरणांतर्गत देय असणाऱ्या प्रोत्साहनात्मक बाबींकरिता प्रकल्प विकासक/ प्रकल्पधारकास महाऊर्जाकडून मूलभूत सुविधा संमती देण्यात येईल.

५.९ या धोरणान्वये ज्या प्रकल्पांना दिनांक ०१-०४-२०१५ पासून महाऊर्जाकडून मूलभूत सुविधा संमती देण्यात आली आहे व त्यान्वये प्रकल्प कार्यान्वित करण्यात आले आहेत त्या प्रकल्पांना या धोरणातील प्रोत्साहनात्मक बाबी लागू राहतील.

५.१० शासन निर्णय दिनांक १४-१०-२००८ च्या धोरणांतर्गत ज्या प्रकल्पांना मूलभूत सुविधा संमती मिळाली आहे परंतु अद्याप प्रकल्प कार्यान्वित झालेले नाहीत असे प्रकल्प हे धोरण जाहीर झाल्यापासून दोन वर्षाच्या कालावधीत कार्यान्वित केले तरच त्यांना दिनांक १४-१०-२००८ च्या धोरणातील तरतुदी व सोयी सवलती / प्रोत्साहनात्मक बाबी लागू राहतील.

५.११ जे प्रकल्प दिनांक ०१-०४-२०१५ पूर्वी कार्यान्वित झाले आहेत परंतु शासन निर्णय दिनांक १४-१०-२००८ व दिनांक १४-०७-२०१० नुसार महाऊर्जाकडून अद्याप मूलभूत सुविधा संमती प्राप्त केलेली नाही त्यांनी प्रोत्साहनात्मक बाबी लागू होण्यासाठी हे धोरण जाहीर झाल्यापासून सहा महिन्याच्या कालावधीत शासन निर्णय दिनांक १४-१०-२००८ व दिनांक १४-०७-२०१० नुसार मूलभूत सुविधा संमती महाऊर्जाकडून घ्यावी. सदर कालावधीत वरीलप्रमाणे पूर्तता न करणा-या प्रकल्पांना या धोरणांतर्गत किंवा यापूर्वीच्या धोरणांतर्गत असणा-या सोयी सवलती / प्रोत्साहनात्मक बाबी लागू राहणार नाहीत.

५.१२ या धोरणांतर्गत कृषिजन्य अवशेषांपासून वीज निर्मिती करणा-या प्रकल्प विकासक/ प्रकल्प धारकांनी त्यांच्या प्रकल्पाकरिता थेट नेमणूक केलेल्या मनुष्यबळापैकी ८० टक्के अकुशल व ५० टक्के अर्धकुशल/कुशल कामगार स्थानिक ग्रामपंचायत हद्दी मधून निवडावे. यासाठी प्रकल्पांतर्गत घेतलेल्या अकुशल कामगारांना योग्य तांत्रिक प्रशिक्षणाद्वारे कुशल बनविण्याची सोय प्रकल्पधारकाने करावी. अशा प्रकल्पांसाठी जमीन उपलब्ध करून देणा-या कुटुंबातील किमान एका सदस्याला प्राधान्याने रोजगार द्यावा.

५.१३ या धोरणांतर्गत कृषिजन्य अवशेषांपासून वीज निर्मिती करणा-या प्रकल्प विकासक/ प्रकल्पधारकांनी त्यांच्या प्रकल्पांतर्गत प्राप्त होणा-या एकूण नफ्याच्या २ % रक्कम कंपनीकडील सामाजिक जबाबदारी (Social Responsibility) अंतर्गत प्रथम स्थानिक ग्रामपंचायतीमधील सुधारणांसाठी उदा. पाणीपुरवठा योजना, आरोग्य सेवा, शाळा व अपारंपरिक ऊर्जा साधनांची आस्थापना करणे यासाठी खर्च करणे अपेक्षित राहील. सदर स्थानिक ग्रामपंचायत हद्दीमध्ये आवश्यक सोयी उपलब्ध करून दिल्यानंतर नजीकच्या ग्रामपंचायत हद्दीमध्ये याअंतर्गत सुधारणा करावी.

६. सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प :-

६.१ राज्यामध्ये सौर ऊर्जा मुबलक प्रमाणात उपलब्ध असून त्यापासून स्वच्छ व प्रदूषण विरहित वीज निर्मिती करता येऊ शकते. सदर ऊर्जा शाश्वत व निरंतर स्वरुपाची असून ती सर्वत्र उपलब्ध आहे.

६.२ या धोरणांतर्गत ७५०० मे.वॅ. क्षमतेचे सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प विकसित करण्यात येतील. यापैकी २५०० मे.वॅ. क्षमतेचे सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प राज्याच्या महानिर्मिती कंपनीकडून त्यांचे येऊ घातलेले नित्यनूतनशील ऊर्जा निर्मिती बंधन (Renewable Generation Obligation) पूर्ण करण्यासाठी सार्वजनिक-खाजगी भागीदारी (Public Private Partnership) पध्दतीने विकसित करण्यात येतील. उर्वरित ५००० मे.वॅ. क्षमतेचे सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प इतर प्रकल्प विकासकांकडून विकसित करण्यात येतील.

६.३ महानिर्मिती कंपनी कडून सार्वजनिक-खाजगी तत्वावर विकसीत करावयाच्या सौर ऊर्जा प्रकल्पांच्या एकूण उद्दिष्टांपैकी १०% उद्दीष्ट कालवा, तलाव, पाटबंधारे खात्याकडील जलस्त्रोत किंवा स्थानिक स्वराज्य संस्थांच्या ठिकाणी उपलब्ध असणाऱ्या जागेवर राबविण्यात येईल. यासाठी महानिर्मिती कंपनी पाटबंधारे खात्या सोबत किंवा इच्छूक स्थानिक स्वराज्य संस्थांसोबत करार करेल. सदर करारामध्ये प्रकल्प उभारणी, महसूल विभागणी, प्रकल्पांचे व्यवस्थापन इत्यादी समावेश असेल.

६.३.१ या धोरणांतर्गत सार्वजनिक-खाजगी भागीदारी (Public Private Partnership) पद्धतीने विकसित होणाऱ्या सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्पातील वीज राज्याच्या महावितरण कंपनीकडील नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधन पूर्ण करण्यासाठी वापरली जाईल. या वीजेचा खरेदी दर विज नियामक आयोगाने ठरविलेल्या अधिमान्य दरानुसार(Preferential Tariff) राहील.

६.४ या धोरणांतर्गत सौर ऊर्जा प्रकल्पांची किमान क्षमता १ मे.वॅ. एवढी राहील.

६.४.१ औद्योगिक क्षेत्र,टाऊनशिप, वखारीचे क्षेत्र अशा ठिकाणच्या उपलब्ध होऊ शकणाऱ्या जमिनीसह इतर ठिकाणी सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प आस्थापित करता येतील.

६.४.२ सौर पार्क पद्धतीने देखील प्रकल्प विकसित करता येतील.

६.४.३ राज्य शासनाच्या पाटबंधारे विकास महामंडळांकडे उपलब्ध असणा-या जमिनींवर तसेच कालव्यांवर व कालव्यालगतच्या जमिनींवर त्यांना स्वत: किंवा खाजगी विकासकांद्वारे सौर ऊर्जा प्रकल्प विकसित करता येतील. मेट्रो रेल्वे व सार्वजनिक वाहतूक व्यवस्थेशी निगडित संस्थांना देखील सौर ऊर्जा प्रकल्प विकसित करता येतील.

६.४.४ अशा प्रकल्पांमधून निर्माण होणारी वीज राज्यातील वीज वितरण परवानाधारक कंपन्यांना स्पर्धात्मक निविदेच्या (Competitive bidding) माध्यमातून, स्वयंवापर करण्यास (captive use), राज्यात व राज्याबाहेर तिस-या घटकास विक्री करण्यास (third party sale) किंवा नित्यनूतनशील ऊर्जा प्रमाणपत्र (REC) च्या माध्यमातून वीज विक्री करण्याची मुभा राहील.

६.४.५ अशा प्रकल्पांना महावितरणकडून खुला प्रवेश (open access) प्राधान्याने देण्यात येईल.

६.५ सौर पार्क:-

६.५.१ सौर पार्क पद्धतीने आस्थापित होणाऱ्या प्रकल्पांची किमान क्षमता १ मे.वॅ. व त्यापेक्षा अधिक राहील. सौर ऊर्जेपासून वीजनिर्मिती प्रकल्पाद्वारे निर्माण होणारी वीज स्वयंवापरासाठी उपयोगात आणू इच्छिणाऱ्या लहान गुंतवणूकदारांना स्वतंत्र सौर पार्क विकसित करता येईल.

६.५.२ यामध्ये १ मे.वॅ. पेक्षा कमी क्षमतेचे परंतु किमान २५० कि.वॅ. क्षमतेचे प्रकल्प विकसित करता येतील.

६.५.३ असे लहान प्रकल्प एकत्रित करून त्यांची क्षमता १ मे.वॅ. झाल्यास त्यास महावितरण/ महापारेषण यांचेकडून पारेषण जोडणी देण्यात येईल.

६.५.४ अशा एकत्रित प्रकल्पामधील वीज संबंधित प्रकल्प विकासक/ प्रकल्पधारकास त्याच्या प्रकल्प क्षमतेनुसार स्वत: पूर्ण वापरण्याची मुभा राहील.

६.६. या धोरणांतर्गत सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी घेण्यात येणाऱ्या जमिनींच्या बाबतीत बिगर शेती जमिनीचा (non-agricultural land) मानीव दर्जा (deemed status) लागू राहील.

६.७ या धोरणांतर्गत सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प उभारण्यासाठी लागणारी खाजगी जमीन प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक यांनी स्वत: उपलब्ध करून घ्यावयाची आहे.

६.८ तथापि, शासकीय पडीक जमीन उपलब्ध असल्यास व संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे मागणी केल्यास नियोजनाच्या दृष्टीने अनुज्ञेयता व अन्य बाबी तपासून देता येईल.

६.८.१ २ मे.वॅ. क्षमतेपर्यंतच्या पारेषण संलग्न सौर ऊर्जेपासून वीज निर्मितीच्या प्रकल्पांना ४ हेक्टर पर्यंत शासकीय जमीन महसूल . महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीचे वितरण करणे) नियम, १९७१ मधील तरतुदीनुसार भाडे आकारून जमिनीच्या उपलब्धतेनुसार प्रकरणपरत्वे नियमित अटी व शर्तीवर ५० टक्के सवलतीच्या दराने भाडेकराराने देण्यात यावे. तसेच या जमिनीचे वितरण महाऊर्जाकडील नोंदणीकृत प्रकल्पांना विनालिलाव करण्यात यावे.

६.९ सौर ऊर्जा प्रकल्पासाठी खाजगी जमीनधारक हे आपली जमीन भाडेकराराने (Lease Basis) देऊ शकतील.

६.१० त्याचप्रमाणे सौर ऊर्जेपासून वीज निर्मितीसाठी सौर मोड्युल्स, उपकरणे व तत्सम सामग्री यांचे उत्पादन करण्यासाठी शासकीय जमीन उपलब्ध असल्यास महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीचे वितरण करणे) नियम, १९७१ मधील वरील उल्लेख केलेल्या तरतुदींच्या अनुषंगाने ५० टक्के सवलतीच्या दराने विनालिलाव भाडेकराराने देण्यात येईल.

६.११ या धोरणांतर्गत सौर ऊर्जा प्रकल्पांना प्रदूषण नियंत्रण मंडळाच्या संमती / ना-हरकत प्रमाणपत्र घेण्यापासून सूट देण्यात येत आहे.

६.१२ स्वतंत्ररित्या आस्थापित केलेल्या सौर ऊर्जा प्रकल्पांसह खाजगी प्रकल्प विकासकांमार्फत आस्थापित केलेल्या सौर ऊर्जा प्रकल्पांना या धोरणांतर्गत सौरऊर्जा प्रकल्पांच्या बाबतीत राज्यातील वीज वितरण परवानाधारक कंपन्यांना वीज नियामक आयोगाच्या मान्यतेने स्पर्धात्मक निविदेच्या पध्दतीने (Competitive bidding) वीज खरेदी करता येईल.

६.१२.१ यामध्ये १ ते ५ मे.वॅ. क्षमतेचे प्रकल्प विकासक क्षेत्रीयदृष्ट्या एकमेकांजवळ असल्यास व तांत्रिकदृष्ट्या योग्य असल्यास सदर स्पर्धात्मक निविदेच्या प्रक्रियेमध्ये स्वतंत्ररित्या किंवा सामूहिक (cluster) पध्दतीने सहभागी होता येईल.

६.१३ या धोरणांतर्गत सौर ऊर्जा निर्मिती प्रकल्पांचे प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक राज्यातील वीज वितरण परवानाधारक कंपन्यांना वीज विक्री करू शकतील. तसेच प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक विजेचा स्वयंवापर करू शकतील किंवा राज्यातील/राज्याबाहेरील इतर ग्राहकास वीज विक्री करू शकतील. नूतनशील ऊर्जा प्रमाणपत्राच्या (Renewable Energy Certificate) मार्गाने देखील वीज विक्री करता येईल.

६.१४ या धोरणांतर्गत सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती करणाऱ्या प्रकल्प विकासक / प्रकल्पधारकांना विजेचा स्वयंवापर (Captive use) करावयाचा असल्यास किंवा तिसऱ्या घटकास विक्री (third party sale) करावयाची असल्यास त्यांना राज्यातील परवानाधारक वीज वितरण कंपन्यांकडून वीज नियामक आयोगाच्या नियमावलीनुसार राज्यात व राज्याबाहेरील खुला प्रवेश (open access) देण्यात येईल.

६.१५ सदर धोरणांतर्गत सौर ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्प आस्थापित करण्याकरिता केंद्र शासनाने मान्य केलेल्या मानांकनानुसार (standards) साहित्याचा वापर करण्यात यावा. त्याबाबत वीज खरेदीदाराकडून पडताळणी करण्यात येईल.

६.१६ या धोरणांतर्गत सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी निष्कासन व्यवस्थेची उभारणी व खर्च याबाबत महाराष्ट्र वीज नियामक आयोगाची नियमावली व आदेश लागू राहतील. सदर निष्कासन व्यवस्था उभारणीसाठी घेण्यात येणारे पर्यवेक्षण शुल्क (supervision charges) लागू राहणार नाही.

६.१७ या धोरणांतर्गत आस्थापित होणाऱ्या सौर ऊर्जा प्रकल्पांना त्यांची इच्छा असल्यास उद्योग विभागाकडे अर्ज करुन उद्योग घटक म्हणून नोंदणी करून घेण्याची मुभा राहील.

६.१८ या धोरणांतर्गत आस्थापित करावयाच्या सौर ऊर्जेपासून वीजनिर्मिती प्रकल्पांची महाऊर्जाकडे नोंदणी करणे आवश्यक राहील.

६.१९ विद्युत शुल्क :- या धोरणांतर्गत आस्थापित होणाऱ्या सौर ऊर्जा प्रकल्पातून निर्माण होणाऱ्या विजेचा वापर स्वत:च्या वापरासाठी (captive use) केल्यास प्रकल्प कार्यान्वित झाल्याच्या दिनांकापासून पहिल्या १० वर्षाकरिता विद्युत शुल्क आकारले जाणार नाही.

६.२० छतावरील सौर वीज निर्मितीच्या पारेषण जोड प्रकल्पांकरीता महाराष्ट्र वीज नियामक आयोगाकडून नियमावली जाहीर झाल्यानंतर स्वतंत्रपणे धोरण निर्गमित करण्यात येईल.

६.२१ सौर ऊर्जा विकासकांना सौर ऊर्जा राज्याबाहेर विक्री करण्यास शासन आवश्यक सोयी बहाल करेल. परंतु, राज्याबाहेर विक्री होणाऱ्या विजेचे प्रमाण धोरणांतर्गत निश्चित केलेल्या उद्दीष्टाव्यतिरिक्त राहील.

७. औद्योगिक टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मिती :-

७.१ राज्यातील उद्योगांमध्ये सेंद्रीय विघटनक्षम (organic degradable) पदार्थांबरोबरच असेंद्रीय विघटनक्षम (inorganic degradable) पदार्थदेखील मोठ्या प्रमाणात निर्माण होत असून त्याची योग्य विल्हेवाट लावणे ही पर्यावरणाच्या दृष्टीने महत्वाची बाब आहे. उद्योगांमधील या प्रकारच्या टाकाऊ पदार्थांच्या सार्वजनिक खुल्या विल्हेवाटीमुळे पर्यावरणाची हानी होते. त्यामुळे अशा टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मिती प्रकल्पांना देखील काही प्रमाणात प्रोत्साहन देण्याचा शासनाचा मानस आहे. अशा पदार्थांपासून स्वतंत्र वीज निर्मिती प्रकल्प (Independent Power Project) विकसित करता येणे शक्य आहे. याकरीता २०० मे.वॅ.चे उद्दीष्ट ठरविण्यात आले आहे.

७.२. असेंद्रीय विघटनक्षम टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मिती प्रकल्पांपासून मिळणारी वीज संबंधित वीज वितरण परवानाधारक त्यांच्या स्तरावरील स्पर्धात्मक निविदा (Competitive bidding) च्या माध्यमातून खरेदी करतील.

७.३ या धोरणांतर्गत वर उल्लेख केलेल्या सेंद्रीय विघटनक्षम औद्योगिक टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मितीच्या प्रकल्प विकासक / प्रकल्पधारकांना या धोरणांतर्गत परतावा व सूट मिळण्यासाठी सर्वप्रथम राज्यातील कोणत्याही वीज वितरण परवानाधारक कंपन्यांना त्यांचे नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधन (Renewable Purchase Obligation) पूर्ण करण्यासाठी वीज विक्री करणे आवश्यक राहील. वीज वितरण परवानाधारक कंपन्यांचे नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधन पूर्ण झाल्यानंतर प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक विजेचा स्वयंवापर करू शकतील किंवा राज्यातील / राज्याबाहेरील इतर ग्राहकास वीज विक्री करू शकतील. तसेच नित्यनूतनशील ऊर्जा प्रमाणपत्राच्या (Renewable Energy Certificate) मार्गाने वीज विक्री करता येईल.

७.४ निष्कासन व्यवस्था :-

७.४.१ प्रकल्पासाठी लागणाऱ्या लघु दाब, उच्च दाब आणि अति उच्च दाब उपकेंद्राचे व त्यांना लागणाऱ्या पारेषण व वितरण वाहिन्यांचे सर्वेक्षण महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी व प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक संयुक्तपणे करतील.

७.४.२ सर्वेक्षणाप्रमाणे उभारण्यात येणारी लघुदाब, उच्च दाब व अति उच्च दाब उपकेंद्रे व त्यांना लागणाऱ्या लघु दाब, उच्च दाब व अति उच्च दाबाच्या पारेषण व वितरण वाहिन्यांची कामे प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीच्या तांत्रिक परिमाणानुसार (Technical Specifications) व त्यांनी मान्य केलेल्या अंदाजपत्रकानुसार तसेच महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीच्या देखरेखीखाली स्वखर्चाने करून घेतील.

७.४.३ या निष्कासन व्यवस्थेमध्ये अस्तित्वात असलेली उपकेंद्रे आणि पारेषण व वितरण वाहिन्यांमध्ये जे काही सुदृढीकरण अथवा बदल करावे लागतील त्यांचा समावेश असेल.

७.४.४ प्रकल्पांच्या ठिकाणापासून ते लघु दाब, उच्च दाब व अति उच्च दाब उप केंद्रापर्यंत जोडल्या जाणा-या ११ के.व्ही. व त्यापेक्षा अधिक दाबाच्या वाहिन्यांचाही समावेश या निष्कासन व्यवस्थेमध्ये असेल.

७.५ निष्कासन व्यवस्थेचा खर्च :-

७.५.१ हरित ऊर्जा निधीतून निष्कासन व्यवस्थेच्या खर्चापोटी देय असलेल्या अर्थसहाय्यासाठी महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीने मंजूर केलेले अंदाजपत्रक आणि त्यांनी प्रमाणित केलेल्या प्रत्यक्ष खर्चाची रक्कम यापैकी जी कमी असेल ती रक्कम निष्कासन व्यवस्थेचा खर्च म्हणून गृहित धरण्यात येईल.

७.५.२ निष्कासन व्यवस्थेच्या खर्चाचा हरित ऊर्जा निधीमधून परतावा :- औद्योगिक टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मिती प्रकल्पांसाठी प्रकल्प विकासकाने / प्रकल्पधारकाने स्वखर्चाने उभारलेल्या निष्कासन व्यवस्थेसाठी प्रति प्रकल्प कमाल रु.१ कोटी एवढी रक्कम अर्थसहाय्य म्हणून महाऊर्जाकडून प्रकल्प विकासक / प्रकल्पधारक यांना हरित ऊर्जा निधीमधून निधीच्या उपलब्धतेनुसार परतावा स्वरूपात देण्यात येईल.

७.५.३ औद्योगिक टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मिती प्रकल्प त्या निष्कासन व्यवस्थेवर कार्यान्वित झाल्यानंतर तसेच सदर निष्कासन व्यवस्था महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांच्याकडे हस्तांतरित झाल्यानंतर त्याचप्रमाणे महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी / महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांनी त्याबाबत व निष्कासन व्यवस्थेच्या खर्चाबाबत प्रमाणित केल्यानंतरच निष्कासन व्यवस्थेसाठी हरित ऊर्जा निधीच्या उपलब्धतेनुसार महाऊर्जाकडून अर्थसहाय्य देण्यात येईल.

७.६ विद्युत शुल्क :- या धोरणांतर्गत आस्थापित होणा-या औद्योगिक टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मिती प्रकल्पातून निर्माण होणा-या विजेचा वापर स्वत:च्या वापरासाठी केल्यास प्रकल्प कार्यान्वित झाल्याच्या दिनांकापासून पहिल्या १० वर्षाकरिता विद्युत शुल्क आकारले जाणार नाही.

७.७ औद्योगिक टाकाऊ पदार्थापासून वीज निर्मिती प्रकल्पासाठी वीज खरेदी दर ठरविताना या धोरणांतर्गत देण्यात येणा-या प्रोत्साहनात्मक बाबी राज्य वीज नियामक आयोगाकडून विचारात घेण्यात येतील.

७.८ या धोरणांतर्गत देय असणाऱ्या प्रोत्साहनात्मक बाबींकरिता प्रकल्प विकासक/ प्रकल्पधारकास महाऊर्जाकडून मूलभूत सुविधा संमती देण्यात येईल.

७.९ या धोरणांतर्गत औद्योगिक टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मिती करणाऱ्या प्रकल्प विकासक / प्रकल्प धारकांनी त्यांच्या प्रकल्पाकरिता थेट नेमणूक केलेल्या मनुष्यबळापैकी ८० % अकुशल व ५० % अर्धकुशल / कुशल कामगार स्थानिक ग्रामपंचायत हद्दी मधून निवडणे अपेक्षित राहील. यासाठी प्रकल्पांतर्गत घेतलेल्या अकुशल कामगारांना योग्य तांत्रिक प्रशिक्षणाद्वारे कुशल बनविण्याची सोय

प्रकल्पधारकाने करावी. अशा प्रकल्पांसाठी जमीन उपलब्ध करून देणाऱ्या कुटुंबातील किमान एका सदस्याला प्राधान्याने रोजगार द्यावा.

७.१० या धोरणांतर्गत औद्योगिक टाकाऊ पदार्थांपासून वीज निर्मिती करणाऱ्या प्रकल्प विकासक/ प्रकल्पधारकांनी त्यांच्या प्रकल्पांतर्गत प्राप्त होणाऱ्या एकूण नफ्याच्या २ % रक्कम कंपनीकडील सामाजिक जबाबदारी (Social Responsibility) अंतर्गत प्रथम स्थानिक ग्रामपंचायतीमधील सुधारणांसाठी उदा. पाणीपुरवठा योजना, आरोग्य सेवा, शाळा व अपारंपरिक ऊर्जा साधनांची आस्थापना करणे यासाठी खर्च करणे अपेक्षित राहील. सदर स्थानिक ग्रामपंचायत हद्दीमध्ये आवश्यक सोयी उपलब्ध करून दिल्यानंतर नजीकच्या ग्रामपंचायत हद्दीमध्ये याअंतर्गत सुधारणा करावी.

८. इतर बाबी :-

८.१ अपारंपरिक ऊर्जा प्रकल्पामधून निर्माण होणारी वीज राज्यात किंवा राज्याबाहेर खुल्या प्रवेशाच्या माध्यमातून विक्री करण्यासाठी प्राप्त होणाऱ्या अर्जावर महाराष्ट्र वीज नियामक आयोगाच्या खुला प्रवेश नियमावलीनुसार वेळेत मंजूरी / निकाली देण्यात आली नसल्यास अशा पात्र अपारंपरिक ऊर्जा प्रकल्प धारकांना मानीव खुला प्रवेश (Deemed Open Access) मिळाल्याचे समजण्यात येईल.

८.२ ज्या अपारंपरिक ऊर्जा प्रकल्पांचे महावितरण कंपनीसोबत वीज करार झालेले आहेत त्यांची इच्छा असल्यास अशा प्रकल्पांना वीज करार मोडून खुला प्रवेश घेण्याची मुभा राहील.

८.३ वरील सर्व बाबीं व्यतिरिक्त या धोरणांतर्गत नवीन व नवीकरणीय ऊर्जेपासून वीज निर्मिती प्रकल्पांना महाराष्ट्र वीज नियामक आयोगाने वेळोवेळी दिलेले आदेश लागू राहतील. यामध्ये वीज खरेदी व तत्संबंधी बाबी, वीज खरेदी करार व तत्संबंधी बाबी, तसेच बँकिंग व व्हीलिंग शुल्क, पारेषण व वितरण हानी शुल्क, क्रॉस सबसिडी सरचार्ज इ. बाबींचा समावेश आहे.

८.४ तसेच भारतीय विद्युत कायदा २००३ च्या तरतुदीं अंतर्गत नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्रोतातून वीज निर्मितीस प्रोत्साहन देणे, अशा प्रकारची वीज पारेषण वाहिनीस जोडण्यासंबंधी योग्य उपाययोजना करणे, वीज विक्री विषयक बाबी निश्चित करणे, अशा प्रकारच्या वीजेच्या खरेदीचे प्रमाण निश्चित करणे (RPO) व अनुषंगिक बाबी महाराष्ट्र वीज नियामक आयोगाच्या कार्यकक्षेत येत असून याबाबत आयोगाने वेळोवेळी दिलेले आदेश संबंधितांना लागू राहतील.

८.५ महसूल विभागाने दिलेल्या अभिप्रायानुसार, नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्रोतांपासून ऊर्जा निर्मिती करणाऱ्या प्रकल्पांकरीता म्हणजेच औद्योगिक कारणासाठी विना लिलाव जमीन प्रदानाची तरतूद महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ या नियमात नसल्यामुळे निविदा प्रक्रियेतून उक्त ऊर्जा प्रकल्पासाठी निवडलेल्या संस्थेस थेट विना लिलाव शासकीय जमीन प्रदान करण्यासंदर्भातील आवश्यक सुधारणा महसूल विभागाने कराव्यात.

९. सदरचा शासन निर्णय महसूल व वन विभाग, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, नियोजन विभाग, जलसंपदा विभाग, उद्योग विभाग व पर्यावरण विभाग यांच्या सहमतीने आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २८७/२०१५/व्यय-१६, दिनांक २ जुलै, २०१५ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२०१५०२४१६२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rohini Prabhakar Jadhav

Digitally signed by Rohini Prabhakar Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rohini Prabhakar Jadhav
Date: 2015.07.20 15:05:55 +05'30'

**( रोहिणी प्र. जाधव )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री, नवीन व नवीकरणीय ऊर्जा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अध्यक्ष, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने) ***
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
५) अप्पर मुख्य सचिव (सामान्य प्रशासन विभाग), मंत्रालय, मुंबई.
६) अप्पर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
७) अप्पर मुख्य सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई.
८) अप्पर मुख्य सचिव (वने), मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव (उद्योग), मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव (आदिवासी), मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव (नगर विकास-२), मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव (ग्राम विकास), मंत्रालय, मुंबई.
१४) प्रधान सचिव (पर्यावरण), मंत्रालय, मुंबई
१५) सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), मंत्रालय, मुंबई.
१६) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), येरवडा, पुणे-४११ ००६.
१७) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
१८) मुख्य अभियंता (विद्युत), महाराष्ट्र शासन, सार्वजनिक बांधकाम विभाग, प्रशासकीय इमारत, ३रा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पूर्व),मुंबई-७१.
१९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्या.,मुंबई-५१.
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ वितरण कंपनी मर्या.,मुंबई-५१.
२१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई-५१.
२२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ पारेषण कंपनी मर्या.,मुंबई-५१.
२३) ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.
२४) निवड नस्ती (ऊर्जा-७), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.